मंत्रालयीन विभागातील लिपिक / लिपिक-टंकलेखक सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा २०१५ ला पुन्हा ( Repeater )बसू इच्छित असलेल्या उमेदवारांचे अर्ज पाठविण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः सेप्रप-१९१५ / प्र.क्र.१ / का-१७

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ३२.
तारीख: ३० मार्च, २०१५.

**वाचा -**

**१) शासन परिपत्रक क्रमांकः सेप्रप-१९१५ / प्र.क्र.१ / का-१७, दिनांक ०७.०२.२०१५**

**शासन परिपत्रक -**

मंत्रालयीन प्रशासकीय विभागातील लिपिक / लिपिक-टंकलेखकांची सन २०१५ मधील सेवा प्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा आयोजित करावयाची असून संबंधित उमेदवारांचे प्रशिक्षण दिनांक ७.०२.२०१५ च्या परिपत्रकानुसार आयोजित केले आहे.

२. वर नमुद उमेदवारांव्यतिरिक्त प्रशासकीय विभागातील ज्या लिपिक / लिपिक-टंकलेखकांनी यापूर्वी सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षेला बसून सदर परीक्षेत अनुत्तीर्ण झाले आहेत किंवा परीक्षेला अनुपस्थित राहीले होते अशा उमेदवारांना लिपिक / लिपिक-टंकलेखक सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा २०१५ ला बसावयाचे असल्यास अशा लिपिक / लिपिक-टंकलेखकांचे विहित नमुन्यातील अर्ज ( त्या अर्जात उमेदवाराचे संपूर्ण नाव नमूद करून ) प्रशासकीय विभागांच्या आस्थापना अधिकाऱ्यांनी अर्जातील सर्व तपशील बरोबर असल्याची खात्री करुन / प्रमाणित करुन या विभागाकडे निश्चितपणे दिनांक १३ एप्रिल, २०१५ पर्यंत पोच होतील अशा पध्दतीने पाठवावेत .

३. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी सदर परिपत्रक संबंधित लिपिक / लिपिक-टंकलेखकांच्या ( प्रतिनियुक्ती वर / रजेवर असलेल्या लिपिक / लिपिक-टंकलेखकांसह ) कृपया लेखी स्वरुपात त्वरीत निदर्शनास आणावे व त्यांची स्वाक्षरी घेऊन, ती कागदपत्रे आपल्या अभिलेखात जतन करुन ठेवावीत. लिपिक / लिपिक-टंकलेखक पदावर नियमित नियुक्त झालेले उमेदवारच फक्त या परीक्षेला बसू शकतात, याची सर्व प्रशासकीय विभागांनी कृपया नोंद घेवून वेळीच उचित कारवाई करावी. या संदर्भात काही त्रुटी राहील्यास, त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाच्या आस्थापना अधिकाऱ्यांची राहील याची कृपया नोंद घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३०१२१८४४८६०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK DHONDIBA BHAWAR

Digitally signed by ASHOK DHONDIBA BHAWAR
DN: CN = ASHOK DHONDIBA BHAWAR, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = General Administration Dept
Date: 2015.03.30 12:29:10 +05'30'

**(अ.धों.भवार)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना)
२. निवडनस्ती.